सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक/ सामूहिक जमिनीवर वृक्ष लागवड (२४०६ ८५९८) <u>लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत...</u>

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सावंवि-२०१६/प्र.क्र.४६/फ-११

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक : ३० मार्च, २०१७**

<u>वाचा</u> :-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.सावंवि-२०१६/प्र.क्र.४३/फ-११, दिनांक २८.०४.२०१६

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१७/प्र.क.८९ /अर्थ-३, दि.०८.०२.२०१७

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.सावंवि-२०१६/प्र.क्र.४३/फ-११, दिनांक ०७.०३.२०१७

४) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे, यांचे पत्र क्र.कक्ष-१/योजना/प्र.क्र.७/१६-१७/ २७५०/१६-१७, दि.०९.०३.२०१७

<u>प्रस्तावना</u> :-

सामाजिक वनीकरणाचे महत्व लक्षात घेऊन वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता सामाजिक वनीकरणांतर्गत **"निश्चित केलेल्या पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक/सामूहिक जमिनीवर वृक्ष लागवड करणे"** या योजनेंतर्गत रु.१८८.१०लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. या योजनेसाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात संदर्भ क्रमांक १ व ३च्या शासन निर्णयान्वये अनुक्रमे रु.१५०.४८लक्ष व रु.३७.६२लक्ष म्हणजेच एकूण १८८.१० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

२. पानवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक/सामूहिक जमिनीवर वृक्ष लागवड ह्या कामांकरीता व अनुषंगिक जागांवर वृक्ष लागवड करणे इत्यादी कामांसाठी एकूण रु.७७५.००लक्ष अतिरिक्त निधीची आवश्यकता असल्याचे प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे ह्यांनी सदंर्भ क्र.४ मधील पत्रान्वये कळविले आहे. त्याचबरोबर पुढील ३ वर्षात राज्य शासनाने ५० कोटी वृक्ष लागवडीचा महत्त्वाकांक्षी कार्यक्रम हाती घेतला आहे. त्यामध्ये पूर्व पावसाळी कामे, रोपवाटिका विकसन, वृक्षारोपण आणि संगोपन व देखभाल ह्यांचा समावेश आहे. त्याअंतर्गत सामाजिक वनीकरण विभागास दिलेली उद्दीष्टे पूर्ण करण्यासाठी, हाती घेतलेल्या कामांसाठी निधीची गरज आहे.

३. सन २०१६-१७ मध्ये वन विभागाचे संगणकीकरण (२४०६ ८६६९) या योजनेंतर्गत मूळ रु.७००.००लक्ष आणि जुलै, २०१६ मध्ये पूरक मागणीद्वारे रु.३००.००लक्ष याप्रमाणे एकूण रु.१०००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत होता. सदर योजनेंतर्गत Implementation of GIS Cell व चंद्रपूर वनवृत्तामधील ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्पामध्ये E-eye surveillance प्रणाली लागू करणे याकरीताचे दोन प्रस्ताव माहिती तंत्रज्ञान विभागास सादर करण्यात आले होते. त्या प्रकल्पांची कामे वेळेवर व्हावीत व निधी अभावी अडचण येऊ नये म्हणून आवश्यक निधी वेळीच उपलब्ध करुन घेण्यात आला होता. परंतु वन विभागांतर्गत E-eye surveillance प्रणालीच्या यापूर्वी मंजूर झालेल्या RPF प्रस्तावानुसार कामे पूर्ण करण्यास अडचणी निर्माण होत असल्यामुळे RPF प्रस्तावात सुधारणा करण्याची विनंती माहिती तंत्रज्ञान विभागास करण्यात आली होती. तथापि, सदर प्रस्तावास त्यांची मान्यता मिळू शकली नसल्यामुळे सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात ठरविलेली सदरची कामे पूर्ण होणे शक्य होत नाही.

४. त्याचप्रमाणे वन विभागाच्या Implementation of GIS Cell याबाबतचा प्रस्ताव माहिती तंत्रज्ञान विभागाकडे पाठविण्यात आला. या संदर्भात माहिती तंत्रज्ञान विभागामार्फत यापूर्वी दोन वेळा बैठका आयोजित करण्यात आल्या होत्या.

तथापि, सदरच्या बैठका अपरिहार्य कारणांमुळे पुढे ढकलण्यात आल्याचे त्यांचेमार्फत कळविण्यात आले. तथापि, सन २०१६-१७ वित्तीय वर्ष संपत आले असल्यामुळे सदर कामांसाठी ह्या वर्षात खर्च होणे शक्य होत नाही.

५. उपरोक्त बाबी विचारात घेता, सुधारित अंदाजपत्रकाच्या मर्यादेत E-eye surveillance & GIS अंतर्गत मागणी क्र. सी-७ मधील प्रधान लेखाशीर्ष २४०६, वनीकरण व वन्यजीवन, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, (१७) (०१) वन विभागाचे संगणकीकरण (२४०६ ८६६९) अंतर्गत सन २०१६-१७ मधील अखर्चित निधी रु.३८७.००लक्ष २४०६ ८५९८ या संकेतांकामध्ये पुनर्विनियोजनेद्वारे वळविण्याचे प्रस्तावित आहे.

६. त्याचप्रमाणे राष्ट्रीय बांबू अभियान (२४०६ ए००४) ही योजना सदर २०१६-१७ पासून कृषी विभागांतर्गत कृषी वानिकीमध्ये (Agro Forestry) अंतर्भूत केल्याचे कळविले आहे. त्यामुळे, मागणी क्र. सी-७, प्रधान लेखाशीर्ष-२४०६, वनीकरण व वन्यजीवन, १०२ सामाजिक व क्षेत्रीय वनीकरण, (११) (२२) राष्ट्रीय बांबू अभियान (२४०६ ए००४) अंतर्गत सन २०१६-१७ मधील अखर्चित रु.१०२.५५ लक्ष इतका निधीदेखील वळविणे प्रस्तावित आहे.

७. सबब २४०६८६६९ आणि २४०६ ए००४ या दोन लेखाशीर्षांमध्ये बचत होणारा अनुक्रमे रु.३८७.०० लक्ष आणि रु.१०२.५५ लक्ष असा एकूण रु.४८९.५५ लक्ष इतका निधी "मागणी क्र.सी-७, २४०६ वनीकरण व वन्यजीवन, (योजनांतर्गत) (०१) वनीकरण, १०२, सामाजिक क्षेत्रीय वनीकरण (०१) (०२) निश्चित केलेल्या पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक/सामूहिक जमिनीवर वृक्ष लागवड करणे (२४०६ ८५९८) ३३-अर्थसहाय्य" या योजनेंतर्गत पुनर्विनियोजनेद्वारे वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

वर नमूद केलेली संपूर्ण पार्श्वभूमी विचारात घेऊन, सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात सामाजिक वनीकरण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या "**निश्चित केलेल्या पाणलोट क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक/सामूहिक जमिनीवर वृक्ष लागवड करणे"** (२४०६ ८५९८) या योजनेकरिता रु.४८९.५५लक्ष इतका पुनर्विनियोजनेद्वारे निधी मंजूर करण्यात येत आहे. तसेच सदर निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. विवरणपत्र-१ प्रमाणे निधी वितरणाचा कॅश फ्लो सोबत जोडला आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. मंजूर निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास महासंचालक, सामाजिक वनीकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामधील तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर आणि महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत व्हावे.

**३. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.**

**"मागणी क्र.सी-७, २४०६ वनीकरण व वन्यजीवन, (योजनांतर्गत) (०१) वनीकरण, १०२, सामाजिक क्षेत्रीय वनीकरण (०१) (०२) निश्चित केलेल्या पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक/सामूहिक जमिनीवर वृक्ष लागवड करणे (२४०६ ८५९८) ३३-अर्थसहाय्य".**

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११२१/१६.०३.२०१७ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२३/अर्थ-६/२३.०३.२०१७ नुसार आणि वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक ०८ फेब्रुवारी, २०१७ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३३११२४०३२४४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.03.31 12:42:43 +05'30'

**(डी. एल. थोरात)**
**सहसचिव (वने), महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन बल प्रमुख ),नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक व उप महासंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण ठाणे/पुणे/नाशिक/औरंगाबाद/ अमरावती/नागपूर.
५. सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, (सर्व जिल्हे)
६. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई४०० ०३२.
९. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१०. वित्त विभाग, व्यय-०९, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन अधिकारी, फ-२,फ-७,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. निवड नस्ती-फ-११

## विवरणपत्र -१

## शासन निर्णय क्र.सावविं-२०१७/प्र.क्र.४६/फ-११, दि.३०.०३.२०१७

**योजनेचे नाव:- "निश्चित केलेल्या पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक/सामूहिक जमिनीवर वृक्ष लागवड करणे"**

**मुख्यलेखाशीर्ष :- (२४०६ ८५९८)** (रु. लाखात)

| सविस्तर लेखाशीर्ष | प्रस्तावांतर्गत मागणी केलेली रक्कम | मार्च , २०१७ | एकूण |
|---|---|---|---|
| मागणी क्र.सी-७, २४०६ वनीकरण व वन्यजीवन, (योजनांतर्गत) (०१) वनीकरण, १०२, सामाजिक क्षेत्रीय वनीकरण (०१) (०२) निश्चित केलेल्या पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक/सामूहिक जमिनीवर वृक्ष लागवड करणे (२४०६ ८५९८) ३३-अर्थसहाय्य | ४८९.५५ | ४८९.५५ | ४८९.५५ |

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.03.31 12:44:33 +05'30'

(डी. एल. थोरात)
सहसचिव (वने), महसूल व वन विभाग